**सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत कार्यान्वीत (बांधकाम) होणाऱ्या इतर प्रशासकीय विभागाच्या इमातींच्या कामकाजावर देखरेख व नियंत्रण ठेवण्याकरिता एक स्वतंत्र समर्पित बांधकाम कक्ष स्थापन करणे ....**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक बांधकाम विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक : बीडीजी-२०२५/प्र.क्र.९३/इमा-३**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- २८ मार्च, २०२५

**प्रस्तावना :**

महाराष्ट्र शासनाने प्रसृत केलेल्या कार्यनियमावलीनुसार राज्यांतर्गत रस्ते, पुल व इमारती यांच्या बांधकामांचे व देखभाल दुरूस्तीचे कार्य सार्वजनिक बांधकाम विभागास वर्ग करण्यात आले आहेत. परंतु, काही प्रशासकीय विभागांना त्यांच्या अधिपत्याखाली क्षेत्रीय स्तरावर मोठ्या प्रमाणावर इमारतींची आवश्यकता लागत असल्याने व सदर इमारतींची बांधकाम विहित वेळेत पुर्ण करण्याच्या दृष्टीने, त्या विभागांना नेमून देण्यात आलेल्या मुळ कर्तव्याव्यतिरिक्त, तांत्रिक कुशलता व सक्षम मनुष्यबळ नसतांना "स्वतंत्र बांधकाम कक्ष" स्थापन अथवा प्रस्तावित करित आहेत. सदर बाब मा.मुख्यमंत्री महोदयांच्या निदर्शनास आणली असता, "सर्व प्रशासकीय विभागांनी त्यांच्या अधिपत्याखालील बांधकाम कक्ष टप्याटप्याने बंद करुन दिनांक ३१.१२.२०२५ पर्यंत कामे सार्वजनिक बांधकाम विभागाकडे हस्तांतरीत करावीत तसेच यापुढे कोणत्याही इतर प्रशासकीय विभागाने बांधकाम कक्ष सुरु करु नयेत", असे निर्देश दिले होते. सदर बाब या विभागाच्या दि.१३.०२.२०२५ च्या पत्रान्वये सर्व प्रशासकीय विभागांना कळविण्यात आली आहे. तसेच, मोठ्या प्रमाणावर इमारतींची आवश्यकता लागत असलेल्या प्रशासकीय विभागांच्या बांधकामांना वेग देण्याकरिता मंत्रालय स्तरावर सार्वजनिक बांधकाम प्रशासकीय विभाग स्तरावर एक "स्वतंत्र समर्पित बांधकाम कक्ष" स्थापन करण्याबाबतही मा.मुख्यमंत्री महोदयांनी सुचीत केले होते. त्यानुषंगाने स्वतंत्र बांधकाम कक्ष स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

सार्वजनिक बांधकाम विभागामार्फत कार्यान्वीत (बांधकाम) होणाऱ्या (१) आदिवासी विकास विभाग, (२) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, (३) वैद्यकीय शिक्षण व औषध्दी द्रव्ये विभाग व (४) सार्वजनिक आरोग्य विभाग, या प्रशासकीय विभागाच्या इमातींच्या बांधकामास वेग देण्याकरिता मंत्रालय स्तरावर सार्वजनिक बांधकाम विभागांतर्गत उप सचिव (इमारती) यांच्या देखरेखीखाली एक "स्वतंत्र समर्पित बांधकाम कक्ष" स्थापन करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे. इतर प्रशासकीय विभागासंदर्भात करण्यात येणारी कार्यवाही, प्रचलीत पध्दतीने मंत्रालय स्तरावरील सार्वजनिक बांधकाम प्रशासकीय विभागामार्फत नियमित सुरु ठेवण्यात यावी.

२. सदर बांधकाम कक्षाची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील :-

i. वरील ४ विभागामार्फत प्रस्तावित करण्यात येणाऱ्या नवीन इमारतींकरिता त्यांच्या क्षेत्रीय कार्यालयांच्या आवश्यकतेनुसार बांधकामाचे नकाशे व अंदाजपत्रक प्राप्त होताच, त्यांची तांत्रिक

छाननी करुन योग्यत्या किमतीस प्रशासकीय मान्यता देण्याची मा.उच्च स्तरीय सचिव समितीकडे शिफारस करेल.

ii. तद्नंतर संबंधीत प्रशासकीय विभागाने प्रदान केलेल्या प्रशासकीय मान्यतेस अनुसरुन सा.बां. विभागाच्या क्षेत्रीय कार्यालयाने राबविलेल्या निविदा प्रक्रियेअंती प्राप्त झालेला प्रस्तावाची छाननी करुन प्रस्ताव निविदा स्विकृतीसमोर सत्वर सादर करेल.

iii. निविदा स्विकृतीनंतर कार्यारंभ आदेशापासून काम पूर्ण होऊन इमारत संबंधीत प्रशासकीय विभागास हस्तांतरीत होईपर्यंत सर्व बाबींवर देखरेख ठेऊन कामे विहित वेळेत पुर्ण करुन घेईल.

iv. सदर बांधकामास काही अपरिहार्य कारणास्तव सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागल्यास सुधारित प्रशासकीय मान्यतेची कार्यवाही देखील या कक्षामार्फत हाताळली जाईल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२८१७१६४५९०१८ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Niranjan Arvind Telang

Digitally signed by Niranjan Arvind Telang
DN: c=IN, o=Personal, title=9063, pseudonym=808504E1840507D524A59E9B12022856, 2.5.4.20=89d38a2c9230e75a1a2c8fdd5df231d32cfece750d8169eb1e76253ec8cea058, postalCode=411007, st=Maharashtra, serialNumber=8A19090F62FA3B97329B76BE28B7ACCE0890866861A242BDCB38DB4A1D1CE2EA, cn=Niranjan Arvind Telang
Date: 2025.03.28 17:17:57 +05'30'

**( निरंजन तेलंग )**
**शासनाचे उप सचिव**

**प्रति,**

अपर मुख्य सचिव (सा.बां.), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
अपर मुख्य सचिव (सार्वजनिक आरोग्य), सार्वजनिक आरोग्य विभाग, मुंबई
प्रधान सचिव (वैद्यकीय शिक्षण), वैद्यकीय शिक्षण व औषध्दी द्रव्ये विभाग, मुंबई
प्रधान सचिव (आदिवासी विकास), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव (सामाजिक न्याय), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
सचिव (बांधकामे), सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व मुख्य अभियंता / अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग.